**<u>सातवा वेतन आयोग</u>**

**विमुक्त जाती भटक्या जमाती विशेष मागासवर्गाच्या मुलांसाठीच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांमधील पुर्णवेळ शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्र.विभशा-२०१९/प्र.क्र.२४८/विजाभज-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.

दिनांक - १० जून २०२०

**<u>वाचा:</u>-** १) शासन निर्णय वित्त विभाग क्र.वेपुर-२०१८/प्र.क्र.४४/सेवा-९, दि.१/१/२०१९.

२) शासन अधिसूचना वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.०१/सेवा-९, दि.३०/१/२०१९.

३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.०९/सेवा-९, दि.२०/२/२०१९.

४) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.९१८, दि.१६/३/२०१९.

५) शासन निर्णय, इमाव विभाग क्र.विभशा-२०१९/प्र.क्र.२४८/विजाभज-२, दि.२९/७/२०१९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सातव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीवरील केंद्र शासनाचे निर्णय विचारात घेऊन राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्याकरीता श्री.के.पी.बक्षी, सेवानिवृत्त अप्पर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी शासनाने काही फेरफारासह स्वीकृत करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्याअनुषंगाने इतर राज्य शासकीय कर्मचाऱ्यांबरोबर अनुदानित शाळांतील पूर्णवेळ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २०१८ च्या संदर्भ क्रमांक २ अन्वये अधिसूचित केले आहेत. तसेच संदर्भ क्रमांक ३ च्या परिपत्रकानुसार प्रारंभिक वेतननिश्चितीबाबत व थकबाकी अदा करण्यासंदर्भात सविस्तर कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. वाचा येथील क्र.४ नुसार संचालनालयाकडून इतर मागास बहुजन कल्याण विभागातील शासन मान्यताप्राप्त व अनुदानित उच्च माध्यमिक आश्रमशाळांमधील मान्यताप्राप्त शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना देय होणारी सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर प्राप्त प्रस्तावानुसार या विभागाच्या उच्च

माध्यमिक आश्रमशाळांतील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता असे निर्देश देत आहे की, संदर्भ क्रमांक २ अन्वये अधिसूचीत केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम,२०१९ मधील सुधारित वेतन संरचना व वेतन निश्चितीचे नियम तसेच संदर्भ क्र.३ अन्वये वेतन निश्चिती व थकबाकी अदा करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या सूचना सोबतच्या जोडपत्रातील इतर मागास बहुजन कल्याण विभागातील शासन मान्यताप्राप्त व अनुदानित उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील मान्यताप्राप्त शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना (सुधारित वेतन संरचना) योग्य त्या फेरफारांसह (शासन निर्णयाच्या सोबतच्या जोडपत्रा प्रमाणे) लागू करण्यात येत आहेत.

२. सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती करण्यासाठी आवश्यक तो विकल्प हे आदेश निर्गमित झाल्याच्या दोन महिन्यांच्या आत देण्यात यावा. एकदा दिलेला विकल्प अंतिम राहील.

३. या आदेशान्वये लागू करण्यात आलेल्या सुधारित वेतन संरचनेमुळे होणारा अतिरिक्त खर्च शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे भत्ते यावरील खर्च ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात येतो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व त्या खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२/आपुक दिनांक १७/१/२०२० अन्वये व सेवा-९ कार्यासनाने दि.१७.०१.२०२० रोजी दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००६१११०५९५४९९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.06.15 16:10:11 +05'30'

**( भा. र. गावित )**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. अप्पर मुख्य सचिव वित्त विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय मुंबई
६. प्रधान सचिव इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व) जिल्हा परिषद
११.प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व)
१२.सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
१३.जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४.सर्व मुख्याध्यापक, विजाभज, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा,
१५.स्वीय सहायक, मा.प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.निवडनस्ती (विजाभज-२)

**शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.विभशा-२०१९/प्र.क्र.२४८/विजाभज-२, दि.१०/६/२०२० सोबतचे जोडपत्र.**

| अ.क्र. | पद | वेतनश्रेणी (६ वा वेतन आयोग) | वेतनश्रेणी (७ वा वेतन आयोग) |
|---|---|---|---|
| १. | उच्च माध्यमिक वर्ग संलग्नित असलेल्या माध्यमिक शाळांचे मुख्याध्यापक / प्राचार्य | रु.९३००-३४८०० ग्रेड वेतन रु.४९००/- | S-१८ : ४९१००-१५५८०० |
| २. | द्वितीय श्रेणीतील पदव्युत्तर पदवी आणि बी.एड.शिक्षक | रु.९३००-३४८०० ग्रेड वेतन रु.४६००/- | S-१६ : ४४९००-१४२४०० |
| ३. | प्रयोगशाळा परिचर पदार्थविज्ञान/रसायनशास्त्र हे विषय घेऊन एस.एस.सी. पुर्व वर्गापर्यंत शिकलेल्या | रु.५२००-२०२०० ग्रेड वेतन रु.२०००/- | S-६ : १९९००-६३२०० |
| ४. | प्रयोगशाळा परिचर पदार्थविज्ञान/रसायनशास्त्र या विषयांव्यतिरिक्त विषय घेऊन एस.एस.सी.पुर्व वर्गापर्यंत शिकलेल्या | रु.५२००-२०२०० ग्रेड वेतन रु.२०००/- | S-१ : १५०००-४७६०० |
| ५. | स्वयंपाकी | रु.४४४०-७४४० ग्रेड वेतन रु.१६००/- | S-३ : १६६००-५२४०० |